**निवडसूची / तदर्थ पदोन्नतीसूची**
**सन २०१५-१६**
**पोलीस उप अधिक्षक/सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी) या संवर्गातील पदावर पदोन्नतीने पदस्थापना......**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्र : रापोसे-१०१६/प्र.क्र.२००/पोल-१अ,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- ०२ मार्च, २०१७.

**संदर्भ:-** पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र:पोमसं/२/१०२०/नि.सू.बि.सं. (अभियांत्रिकी)१३-१४/२१३/२०१५, दि.२७.०१.२०१७.

**शासन आदेश :-**

पोलीस उप अधिक्षक/सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी) या पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१५-१६ च्या निवडसूचीमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना “महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५” संदर्भातील सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २८.४.२०१५ आणि दि. १६.७.२०१५ रोजीच्या अधिसूचनेतील तरतुदीनुसार महसुली विभागीय संवर्गाचे वाटप करण्यात आले आहे. सदर महसुली विभाग वाटपानुसार खालील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याचे नियुक्तीचे ठिकाण | पदोन्नतीवरील पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री. दत्तात्रय ज्ञानोबा पवार | पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), पुणे शहर | सहायक पोलीस आयुक्त बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), पुणे शहर |
| २ | श्री. शिवाजी वैजनाथ अलुरे | पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), परभणी | पोलीस उप अधीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), नांदेड परिक्षेत्र |
| ३ | श्री. सुरेश तुकाराम पाटील | पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), गट क्र.१, पुणे | पोलीस उप अधीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), नागपूर परिक्षेत्र |
| ४ | श्री. अनिल गजानन भोपे | पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), पुणे | सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), पूर्व विभाग, नागपूर |
| ५ | श्री. अविनाश दत्तात्रय पांडे | पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), पुणे | पोलीस उप अधीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), अमरावती परिक्षेत्र |

२. पोलीस उप अधिक्षक/सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी) या पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१५-१६ च्या तदर्थ पदोन्नतीसूचीमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना “महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५” संदर्भातील सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २८.४.२०१५ आणि दि. १६.७.२०१५ रोजीच्या अधिसूचनेतील तरतुदीनुसार महसुली विभागीय संवर्गाचे वाटप करण्यात आले आहे. सदर महसुली विभाग वाटपानुसार खालील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याचे नियुक्तीचे ठिकाण | पदोन्नतीवरील पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री. मुकुंद सुखलाल खैरनार | पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), नाशिक परिक्षेत्र | पोलीस उप अधीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक |
| २ | श्री. हरिराम व्यंकटराव कामडी | पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), नागपूर परिक्षेत्र | सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), नागपूर शहर |
| ३ | श्री. संजय सुभाष चांदखेडे | पोलीस निरीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), बृहन्मुंबई | पोलीस उप अधीक्षक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), औरंगाबाद परिक्षेत्र |

३. परिच्छेद क्र.२ मधील अधिका-यांना सरळसेवेच्या पदाकरीता केवळ ११ महिन्यांकरीता अथवा सदर पदाकरीता सरळसेवेद्वारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून अधिकारी उपलब्ध होईपर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून, त्यानंतर सदर पदोन्नती आपोआप संपुष्टात येईल. सदर पदोन्नती सेवाज्येष्ठतेसाठी ग्राहय धरण्यात येणार नाही.

४. उपरोक्त अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय / संक्षिप्त / प्राथमिक चौकशी / न्यायालयीन कार्यवाही, प्रलंबित / प्रस्तावित असल्यास, सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २ एप्रिल, १९७६ च्या परिपत्रकामधील तरतुदीनुसार, त्यांच्याविरूध्द प्रलंबित / प्रस्तावित / संक्षिप्त / प्राथमिक चौकशीअंती त्यांना शिक्षा झाल्यास, सदर शिक्षा ते पदोन्नतीच्या पदावर भोगण्यास तयार असल्याचे हमीपत्र त्यांच्याकडून घेऊनच त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

५. उपरोक्त अधिकाऱ्यांस देण्यात आलेली पदोन्नती, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र: २७९७/२०१५ मधील अंतिम निर्णयाच्या, तसेच, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहेत.

६. उपरोक्त अधिकाऱ्यांस पदस्थापना देताना, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण अथवा अन्य मा. न्यायालयाचे स्थगिती आदेश असल्यास, ते विचारात घेऊन उक्त अधिकाऱ्यांस पदस्थापना देण्यात यावी.

७. उक्त पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांस, सध्याच्या पदावरून कार्यमुक्त करून, त्यांना पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही त्वरित करावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०३०२१७२१०९५६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2017.03.02 17:22:26 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**उप सचिव, गृह विभाग.**

**प्रति,**

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रतिलिपि,**

१. महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२. मा. मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री (गृह) (शहरे/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर पोलीस महसंचालक व संचालक, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी),महाराष्ट्र राज्य, पुणे
८. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक
९. पोलीस आयुक्त, पुणे/नागपूर/औरंगाबाद.
१०. पोलीस अधीक्षक, नांदेड/अमरावती/नाशिक.
११. विशेष पोलीस महानिरीक्षक, नांदेड परिक्षेत्र/ नागपूर परिक्षेत्र/अमरावती परिक्षेत्र/ औरंगाबाद परिक्षेत्र
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नांदेड/अमरावती/औरंगाबाद/नाशिक/नागपूर
१५. सामान्य प्रशासन विभाग (कार्या.१२), मंत्रालय, मुंबई.
१६. संबंधित अधिकारी (पोलीस महासंचालक यांचेमार्फत)
१७. निवडनस्ती (कार्या. पोल-१अ).